पर्यटन विभागांतर्गत मंजूर असलेल्या मोठ्या पर्यटन विकास आराखड्यातील कामांसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक बैठक २०२१/०१/प्र.क्र.८४२/पर्यटन,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : २१ जानेवारी, २०२२.

**संदर्भ :-**

१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. टिडीसी २०१६/२/प्र.क्र.१९६/पर्यटन, दि.३१/३/२०१७

२) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. बैठक २०१७/१०/प्र.क्र. ९६७/पर्यटन, दि.३१/३/२०१७.

३) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र.टिडीएस २०१५/३/प्र.क्र.१८७/पर्यटन, दि.३१/३/२०१७

४) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र टीडीसी २०१६/३/प्र.क्र.२११/पर्यटन, दि.३१/३/२०१७

५) जिल्हाधिकारी, नांदेड यांचे पत्र क्र. जा.क्र. २०२१/जिनिस/मापवि/का-३/१५३२, दिनांक २४.०८.२०२१.

६) जिल्हा नियोजन अधिकारी, औरंगाबाद यांचे पत्र क्र. जा.क्र.जिनिस/संस-३/२०२०/१७१९, दिनांक १८.०१.२०२१.

७) जिल्हा नियोजन अधिकारी, बुलडाणा यांचे पत्र क्र. जा.क्र.जिनिस/ प्रादे.पर्यटन/६०९/२०२१, दिनांक ०९.०८.२०२१.

८) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र. मपविम/बांधकाम/आराखडा/२०२१/३३९, दि.१२.०८.२०२१

९) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.

**प्रस्तावना:**

पर्यटन विभागाअंतर्गत संदर्भ क्रमांक १ ते ४ येथील शासन निर्णयान्वये अनुक्रमे (१) माहूरगड (जि. नांदेड) आराखडा, (२) म्हैसमाळ-सुलीभंजन-वेरुळ- खुल्ताबाद, जि. औरंगाबाद पर्यटन विकास आराखडा, (३) राजमाता जिजाऊ जन्मस्थळ सिंदखेडराजा, जि. बुलडाणा पर्यटन विकास आराखडा व (४) लोणार (जि. बुलडाणा) सरोवर पर्यटन विकास आराखडा या मोठ्या पर्यटन विकास आराखड्यांना मान्यता देण्यात आली आहे. सदर मोठ्या पर्यटन विकास आराखड्यातील कामांसाठी संदर्भ क्रमांक ४ ते ८ येथील पत्रान्वये निधी मागणीचे प्रस्ताव प्राप्त झाले आहेत. यास अनुसरुन सदर मोठ्या पर्यटन विकास आराखड्यातील कामांसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरीत करण्याची बाब विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक १ ते ४ येथील शासन निर्णयान्वये मान्यता दिलेल्या (१) माहूरगड (जि. नांदेड) आराखडा, (२) म्हैसमाळ-सुलीभंजन-वेरुळ- खुल्ताबाद, जि. औरंगाबाद पर्यटन विकास आराखडा, (३) राजमाता जिजाऊ जन्मस्थळ सिंदखेडराजा, जि. बुलडाणा पर्यटन विकास आराखडा व (४) लोणार (जि. बुलडाणा) सरोवर पर्यटन विकास आराखडा या मोठ्या पर्यटन विकास आराखड्यातील कामांसाठी संदर्भ क्रमांक ५ ते ८ येथील पत्रान्वये प्राप्त झालेल्या निधी मागणीच्या प्रस्तावास अनुसरुन सदर मोठ्या पर्यटन विकास आराखड्यातील कामांसाठी खालील तक्त्यामध्ये नमूद केल्याप्रमाणे संबंधित जिल्हाधिकारी / पर्यटन संचालनालय यांना निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रुपये लक्षात)

| अ.क्र. | आराखड्याचे / कामाचे नाव | प्रशासकीय मान्यता | पूर्वी वितरीत निधी | या आदेशान्वये वितरीत निधी |
|---|---|---|---|---|
| १) | माहूरगड (जि. नांदेड) पर्यटन विकासाचा सुधारीत आराखड्यातील कामे | २१६१३.०० | २७७२.०० | ५००.०० |
| २) | म्हैसमाळ-सुलीभंजन-वेरुळ-खुल्ताबाद, जि. औरंगाबाद पर्यटन विकास आराखडा<br>वेरुळ येथील पर्यटक निवास | ७००.०० | २८०.०० | ४२०.०० |
| ३) | राजमाता जिजाऊ जन्मस्थळ सिंदखेडराजा, जि. बुलडाणा पर्यटन विकास आराखड्यातील कामे | | | |
| १ | लखुजीराव जाधव राजवाडा | ४१४.११ | १३१.१५ | ३३९.६३ |
| २ | सावकारवाडा | १९८.२३ | | |
| ३ | रंगमहाल | २१२.०७ | | |
| ४ | निळकंठेश्वर मंदिर | १२७.८९ | | |
| ५ | काळाकोट | ३४४.१९ | | |
| | **एकूण** | **१२९६.४९** | **१३१.१५** | **३३९.६३** |
| ४) | लोणार (जि. बुलडाणा) सरोवर पर्यटन विकास आराखड्यातील विकास कामे | ९१२९.०० | १७५१.२४ | १५४०.११ |
| | | | **एकूण १ ते ४** | **२७९९.७४** |

२. **अटी व शर्ती :-**

१) आराखड्यांतर्गत निर्माण होणाऱ्या मालमत्तेची देखभाल व दुरुस्ती व त्याकरीता निधीची तरतूद करण्याची जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभागाची व संबंधित क्षेत्रिय यंत्रणेची / कार्यालयाची राहील.

२) मालमत्तेच्या देखभाल व दुरुस्तीसाठी स्वतंत्र निधी पर्यटन विभागामार्फत उपलब्ध करुन दिला जाणार नाही.

३) वितरीत केलेल्या निधीतून खर्च करताना वित्तीय नियमांचे आणि विविध नियमांतर्गत नेमून दिलेल्या कार्यपध्दतीचे तसेच संदर्भ क्रमांक ९ येथील वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ च्या शासन निर्णयामधील तरतुदींचे पालन करण्यात यावे.

४) कोणत्याही परिस्थितीत मंजूर अनुदानापेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी. मंजूर अनुदानापेक्षा जादा खर्च झाल्यास त्याची जबाबदारी जिल्हाधिकारी, नांदेड / औरंगाबाद /बुलडाणा व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांची राहील व जादा खर्चा प्रित्यर्थ जादा अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५) मंजूर तरतुदीतून करावयाचा खर्च ३१ मार्च, २०२२ पर्यंत करण्यात यावा व मंजूर कामे तात्काळ पूर्ण करावीत.

६) पर्यटन विभागाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून केलेल्या कामाच्या ठिकाणी सदर कामे पर्यटन विभागाच्या उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून केली असल्याबाबतचे फलक लावण्यात यावेत.

७) ज्या योजनेसंदर्भात निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्या प्रत्येक योजनेच्या संदर्भात वित्तीय अधिकाराच्या प्रत्यावर्तनानुसार सक्षम प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेणे आवश्यक आहे.

८) अशा प्रत्येक योजनेबाबत करावयाच्या बांधकामासंदर्भात अथवा खरेदीबाबत किंवा सेवा पुरवठा कराराबाबत वित्तीय नियमांप्रमाणे आवश्यक ती कार्यपध्दती पाळणे आवश्यक आहे. या संदर्भात शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-संकीर्ण-१००२/प्र.क्र.१५/कोषा-प्र ५, दि. ६ फेब्रुवारी, २००२ च्या सूचनांचे काटेकोरपणे पालन होईल याची खबरदारी संबंधित अंमलबजावणी यंत्रणेने घ्यावी. तसेच शासन निर्णय वित्त विभाग क्र.बीजीटी-१०.००/प्र.क्र.५६/२०००/वित्तीय सुधारणा, दिनांक १०.९.२००१ मधील उपाययोजनांची अंमलबजावणी तंतोतंतपणे करण्यात यावी.

९) तांत्रिक मान्यता विहित स्तरावर घेण्यात यावी.

१०) रस्त्यांच्या प्रस्तावित कामांच्या प्रकरणांमध्ये सार्वजनिक बांधकाम विभागाच्या नियमावलीचे पालन करणे बंधनकारक राहील.

११) योजनेत्तर स्वरुपाच्या कामासाठी (देखभाल/दुरुस्ती इ.) सदरची तरतूद उपयोगात आणली जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

१२) सदर कामांसाठीच्या जागेसंदर्भात योग्य त्या अधिकारी किंवा कार्यालय / संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधणकारक राहील.

१३) सदर कामांपैकी जी कामे तीर्थक्षेत्रांच्या विकासासाठी प्रस्तावित करुन देवस्थान/ संस्थेच्या जागेवर करण्यात येणार आहेत अशा कामांसंदर्भात सदर देवस्थान/

संस्थेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करुन घेणे बंधनकारक राहील. तसेच अशा कामाच्या पूर्णत्वानंतर त्या संदर्भातील देखभाल/दुरुस्ती, संबंधित संस्थेने करण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, नांदेड / औरंगाबाद/ बुलडाणा व महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई यांनी संबंधित संस्थेबरोबर करारनामा करणे बंधनकारक राहील. अशा प्रकारच्या देखभाल दुरुस्तीकरीता शासनाकडून यापुढे कोणत्याही प्रकारचा निधी उपलब्ध करुन दिला जाणार नाही, याची नोंद घेण्यात यावी व तशी अट करारात अंतर्भूत करण्यात यावी. तसेच या कामामुळे निर्माण होणाऱ्या सर्व सुविधा तसेच पर्यटन स्थळ सर्व नागरीकांसाठी खुले राहील, अशी अट करारात समाविष्ट करण्यात यावी.

१४) आराखड्यातील कामांची भौतिक प्रगती तसेच निधीतून होणा-या खर्चाची मासिक विवरणपत्रे दर महिन्याच्या १० तारखेपर्यंत शासनास व पर्यटन संचालनालयामार्फत न चुकता सादर करावीत. तसेच काम पूर्ण झाल्यानंतर पूर्णत्वाचा दाखला आणि निधीबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र न चुकता शासनास पर्यटन संचालनालयामार्फत सादर करण्यात यावे.

१५) सदर काम पूर्ण झाल्यानंतर सदर कामाच्या देखभालीची तसेच इतर अनुषंगिक कामांची जबाबदारी संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, स्थानिक स्वराज्य संस्था, कार्यान्वयीन यंत्रणा व संबंधित संस्था यांची राहील.

१६) प्राप्त निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनास व महालेखापाल कार्यालयास परस्पर सादर करणे तसेच कामांच्या पुर्णत्वाचे प्रमाणपत्र पर्यटन संचालनमार्फत देणे इत्यादी जबाबदारी जिल्हाधिकारी, नांदेड, औरंगाबाद, बुलडाणा व संबंधित कार्यान्वयीन यंत्रणेची राहील.

३. वर नमूद करण्यात आलेला खर्च हा सन २०२१-२२ या वर्षाकरीता मुख्यलेखाशीर्ष **"मागणी क्रमांक झेडडी-४, ३४५२-पर्यटन, पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ पर्यटन केंद्रे (०२) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना, (०२) (१८) पर्यटन विकासासाठी विविध ठिकाणांसाठी मूलभूत सुविधांकरीता अनुदाने (३४५२ १९५८) ३१ सहायक अनुदान"** या लेखाशिर्षाखाली मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा. या प्रकरणी मंजूर करण्यात आलेल्या सहायक अनुदानाची रक्कम आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता (१) माहूरगड (जि. नांदेड) आराखडा, (२) म्हैसमाळ-सुलीभंजन-वेरुळ-खुल्ताबाद, जि. औरंगाबाद पर्यटन विकास आराखडा, (३) राजमाता जिजाऊ जन्मस्थळ सिंदखेडराजा, जि. बुलडाणा पर्यटन विकास आराखडा या आराखड्यांकरीता संबंधित सहायक जिल्हा नियोजन अधिकारी/ जिल्हा नियोजन अधिकारी यांना -आहरण व संवितरण अधिकारी॰ आणि संबंधित जिल्हाधिकारी यांना 'नियंत्रक अधिकारी' म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच लोणार सरोवर पर्यटन विकास आराखड्यासाठी मुख्य लेखाधिकारी, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना 'आहरण व संवितरण अधिकारी' आणि सह संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना 'नियंत्रक अधिकारी' घोषित करण्यात येत आहे. सदर निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची रक्कम त्यांनी संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय / अधिदान व

लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई येथे देयके सादर करुन संबंधितांना वितरीत करण्यात यावी. सदर कार्यवाहीबाबतचा अनुपालन अहवाल शासनास एक महिन्यात सादर करण्यात यावा.

४. प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या सूचनेनुसार व अधिकाराच्या मर्यादेत सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत असून वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१ च्या परिशिष्टामधील तपासणीसूची बाबींची आणि प्रत्येक अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०१२११६५१५०६०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Ramesh Jayaram Kadam

Digitally signed by Ramesh Jayaram Kadam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=931a917c29ea693ba9abee543d58bf1b6ade60ae69c9be92f59d232bb3a3fcc8, serialNumber=c8fbeb4e149e205d858dabb5d81a2a90a8deb719257572300ef79cfab47d9345, cn=Ramesh Jayaram Kadam
Date: 2022.01.21 16:53:04 +05'30'

**(र.ज.कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र - १, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
२. महालेखापाल, महाराष्ट्र - २, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
३. महालेखापाल, (स्थानिक निकाय लेखापरीक्षा व लेखा), मुंबई
४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
५. संचालक, पर्यटन संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, नांदेड / औरंगाबाद/ बुलडाणा
८. जिल्हा नियोजन अधिकारी, नांदेड / औरंगाबाद/ बुलडाणा
९. जिल्हा कोषागार अधिकारी, नांदेड / औरंगाबाद/ बुलडाणा
१०. नियोजन विभाग (कार्यासन-१४११/१४४४), मंत्रालय, मुंबई.
११.वित्त विभाग (का.व्यय-१५/अर्थोपाय / अर्थसंकल्प) मंत्रालय, मुंबई.
१२.अवर सचिव, (अर्थसंकल्प शाखा) पर्यटन व सांस्कृतिक विभाग,मंत्रालय, मुंबई. (यांना आदेशात नमूद करण्यात आलेल्या नियंत्रण अधिका-यांकडे निधी वितरीत करण्याच्या विनंतीसह)
१२. निवड नस्ती, कार्यासन-पर्यटन.

***